ग्रामपंचायत हद्दीतील सौरऊर्जा
प्रकल्पांवर कर आकारणी करणेबाबत.

महाराष्ट्र शासन
ग्राम विकास विभाग
शासन निर्णय क्रमांक: व्हीपीएम- २०१७/प्र.क्र.१७८/पंरा-४
बांधकाम भवन,२५,मर्झबान मार्ग, फोर्ट,
मुंबई ४०० ००१
दिनांक - ०२ जुलै, २०१८

**वाचा** - शासन अधिसूचना क्र. व्हीपीएम-२०१५/प्र.क्र.१४०/पंरा-४ (२२) दिनांक ३१ डिसेंबर ,२०१५.

**प्रस्तावना** -

महाराष्ट्र ग्रामपंचायत अधिनियम कलम १२४ व त्याअंतर्गत महाराष्ट्र ग्रामपंचायत कर व फी (शुल्क) नियम, १९६० यांमधील तरतुदींनुसार गावाच्या सीमेतील इमारती ( मग त्या कृषी आकारणीस अधीन असोत किंवा नसोत ) व जमिनी (ज्या कृषी आकारणीस अधीन नाहीत) यावर ग्रामपंचायतीस कर बसविण्याचा अधिकार आहे.

वाचा येथील शासन अधिसूचना क्र. व्हीपीएम २०१५/प्र.क्र.१४०/पंरा-४ (२२), दिनांक ३१ डिसेंबर, २०१५ अन्वये महाराष्ट्र ग्रामपंचायत कर व फी नियम, १९६० मध्ये सुधारणा करण्यात आली असून, या अधिसूचनेद्वारे इमारती व जमिनीवरील करांबरोबरच पवनचक्की व इतर प्रयोजनांसाठी वापरण्यात येणाऱ्या मनोऱ्यांवर कर आकारणीबाबतच्या तरतुदी करण्यात आलेल्या आहेत.

महाराष्ट्र ग्रामपंचायत अधिनियम कलम १२४ व त्याअंतर्गत महाराष्ट्र ग्रामपंचायत कर व फी (शुल्क) नियम, १९६० या अधिनियम व नियमामध्ये ग्रामपंचायत हद्दीतील सौरऊर्जा प्रकल्पांवर कशा प्रकारे कर आकारणी करावी, याबाबत स्पष्टता नसल्याने ग्रामपंचायत हद्दीतील सौरऊर्जा प्रकल्पांवर कर आकारणी करणेबाबत मार्गदर्शक सूचना निर्गमित करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय** -

सौरऊर्जा हा ऊर्जेचा स्वच्छ व प्रदूषणविरहित स्रोत असून भविष्यातील उर्जेचे संकट निवारण्यासाठी सौरऊर्जेद्वारे वीजनिर्मितीस प्रोत्साहन देणे आवश्यक आहे. ही बाब लक्षात घेता, महाराष्ट्र ग्रामपंचायत अधिनियम कलम १२४ व त्याअंतर्गत महाराष्ट्र ग्रामपंचायत कर व फी (शुल्क) नियम, १९६० यांमधील तरतुदींनुसार ग्रामपंचायत हद्दीतील सौरऊर्जा प्रकल्पांवर कर आकारणी करून वसुली खालीलप्रमाणे करण्यात यावी.

१) सौर ऊर्जा वीज निर्मिती प्रकल्पांना केवळ जमीन /मोकळा भूखंड गृहीत धरून जमिनीच्या भांडवलीमूल्याच्या आधारे कर आकारणी करण्यात यावी. भांडवली मूल्य निश्चितीसाठी

नोंदणी व मुद्रांक विभागाच्या वार्षिक मूल्य दर तक्त्यातील बिनशेती जमिन/भूखंडाचे दर घेण्यात यावे.

२) वाचा येथील अधिसूचनेमधील नियम २० खालील अनुसूची अ मधील तक्ता ४ मध्ये नमूद करण्यात आलेल्या जमिनीवरील कराच्या किमान दराने कर आकारणी करण्यात यावी.

३) तथापि, सौर ऊर्जा प्रकल्पातील सौर संयंत्राव्यतिरिक्त अन्य बांधकामांना/इमारतींना नियमाप्रमाणे कर आकारणी करण्यात यावी.

४) संपूर्ण सौर ऊर्जा प्रकल्पास औद्योगिक व वाणिज्यिक भारांक अनुज्ञेय राहणार नाही.

५) निवासी, व्यावसायिक, औद्योगिक इमारतींच्या छतावरील सौरऊर्जा वीज निर्मितीच्या संयंत्रणांना मालमत्ता कर आकारणी करण्यात येऊ नये.

६) सौर ऊर्जा प्रकल्प बंद असला तरी कर आकारणी करण्यात येईल.

७) सौर ऊर्जा प्रकल्पांवर कर आकारणी करण्याबाबत स्पष्टता नसल्याने सौर ऊर्जा प्रकल्पांवर पूर्वलक्षीप्रभावाने वरीलप्रमाणे कर आकारण्यात यावी. तसेच यापूर्वीची वसुलीची रक्कम जास्त असल्यास सदर रक्कम परत न करता आणि त्यावर कोणतेही व्याज न देता पुढील वर्षांमध्ये करण्यात येणाऱ्या कर आकारणीच्या रक्कमेशी टप्प्या टप्प्याने पुस्तकी समायोजन करावे.

सदरचा शासन निर्णय मुख्य कार्यकारी अधिकारी यांनी त्यांच्या अधिनस्त सर्व संबंधित अधिकारी, कर्मचारी व ग्रामपंचायती यांच्या निदर्शनास आणण्यात यावा व त्याप्रमाणे कार्यवाही करण्यात येईल याची दक्षता घ्यावी.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१८०७०२०९५००५३२२० असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Santosh Bansirao Karad

Digitally signed by Santosh Bansirao Karad
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Rural Development and Water Conservation, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=f981d5a9fec2e5d5dc36f39695b5f0e4ff5b340cd5420df7cbaa28990d692e36, cn=Santosh Bansirao Karad
Date: 2018.07.02 11:59:14 +05'30'

**संतोष कराड**
अवर सचिव, महाराष्ट्र शासन.

प्रत,

१. मा. विरोधी पक्षनेता, विधान परिषद ,विधानमंडळ ,मुंबई.

२. मा. विरोधी पक्षनेता, विधान सभा ,विधानमंडळ ,मुंबई.

३. मा. विधानसभा/मा. विधान परिषद सदस्य ( सर्व)

४. मा. राज्यपाल यांचे सचिव

५. मा. मुख्यमंत्री यांचे अप्पर मुख्य सचिव

६. मा.मंत्री ( ग्राम विकास) यांचे खाजगी सचिव

७. मा. राज्यमंत्री (ग्रामविकास) यांचे खाजगी सचिव

८. मा. मुख्य सचिव यांचे सह सचिव ,महाराष्ट्र राज्य ,मंत्रालय ,मुंबई.

९. प्रधान सचिव (ऊर्जा) ,उद्योग, ऊर्जा व कामगार विभाग ,मंत्रालय ,मुंबई.

१०.अपर मुख्य सचिव/ प्रधान सचिव /सचिव सर्व मंत्रालयीन विभाग ,मुंबई.

११.व्यवस्थापकीय संचालक, महाराष्ट्र राज्य विद्युत मंडळ ,सूत्रधार कंपनी मर्या. ,मुंबई.

१२.व्यवस्थापकीय संचालक, महाराष्ट्र राज्य विद्युत निर्मिती कंपनी मर्या., मुंबई.

१३.व्यवस्थापकीय संचालक, महाराष्ट्र राज्य विद्युत पारेषण कंपनी मर्या. ,मुंबई .

१४.व्यवस्थापकीय संचालक, महाराष्ट्र राज्य विद्युत वितरण कंपनी मर्या. ,मुंबई .

१५.महासंचालक, महाराष्ट्र ऊर्जा विकास अभिकरण ,(महाऊर्जा), पुणे.

१६.विधी मंडळ ग्रंथालय, विधान भवन, मुंबई (१० प्रती).

१७.माहिती व जनसंपर्क महासंचालनालय, मंत्रालय, मुंबई.

१८. सर्व विभागीय आयुक्त.

१९. सर्व जिल्हाधिकारी.

२०.सर्व सह सचिव/ उप सचिव/ अवर सचिव/ कार्यासन अधिकारी ग्राम विकास विभाग, मंत्रालय, मुंबई.

२१. सर्व उपायुक्त (विकास/आस्थापना), विभागीय आयुक्त कार्यालये.

२२.महालेखापाल, महाराष्ट्र-१ मुंबई (लेखा व अनुज्ञेयता).

२३. महालेखापाल, महाराष्ट्र-२ नागपूर (लेखा व अनुज्ञेयता) .

२४.महालेखापाल (लेखापरीक्षा), महाराष्ट्र-१ मुंबई/महाराष्ट्र-२ नागपूर.

२५.संचालक, लेखा व कोषागारे, मुंबई.

२६.सर्व जिल्हा परिषदांचे मुख्य कार्यकारी अधिकारी.

२७.सचिव (ग्राम विकास) यांचे स्वीय सहायक.

२८. माहिती तंत्रज्ञान कक्ष (ग्रा.वि.वि), बांधकाम भवन, मर्झबान पथ, फोर्ट, मुंबई.

२९.निवडनस्ती, कार्यासन पंरा-४.